गडचिरोली जिल्हयातील कुपोषण, बालमृत्यू व मातामृत्यू या बाबत चौकशीसाठी उच्चस्तरीय समिती गठीत करणे बाबत ...

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्र.एबावि-२०१०/प्र.क्र. ११२ /का-५

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १३ जुलै, २०१०.

**शासन निर्णय :-** गडचिरोली जिल्हयातील कुपोषणाचे प्रमाण राज्य सरासरीच्या तुंलनेत जास्त आहे. कुपोषणाचे प्रमाण कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात मोहिम राबवून प्रयत्न करणे व नियमित मुल्यमापन करून उपाययोजना करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेवून कुपोषण, बालमृत्यू व मातामृत्यू याबाबत चौकशी करण्यासाठी खालील प्रमाणे ‘‘उच्चस्तरीय समिती’’ गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी, गडचिरोली | अध्यक्ष |
| २) | अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नागपूर | सदस्य |
| ३) | उपायुक्त (प्रशासन), ए.बा.वि.से.यो.,नवी मुंबई | सदस्य |
| ४) | उपायुक्त (विकास) , विभागीय आयुक्त कार्यालय, गडचिरोली | सदस्य |
| ५) | उपसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, नागपूर मंडळ, नागपूर | सदस्य |
| ६) | जिल्हा आरोग्य अधिकारी , गडचिरोली | सदस्य |
| ७) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण), जि.प., गडचिरोली | सदस्य सचिव |

२ उच्चस्तरीय समितीने गडचिरोली जिल्हयातील कुपोषण , बालमृत्यू मातामृत्यू , इ. कारणांची चौकशी करून त्याबाबतचा अहवाल एक महिन्याच्या आत शासनास सादर करेल.

३. तसेच सदर उच्चस्तरीय समिती कुपोषण,बालमृत्यू,मातामृत्यू कमी करण्याबाबत त्वरित उपाययोजना करेल. त्याच बरोबर, कुपोषणाच्या जटिल समस्येचे निराकरण करण्यासाठी अधिकारी / कर्मचा-यांमध्ये संवेदनशिलता आणणे, अंगणवाडयांच्या इमारतीची दुरूस्ती / बांधकामे,पुरक पोषण आहार, लसीकरण, दुर्धर आजारी बालकांवर औषधोपचार, अधिकारी / कर्मचा-यांची रिक्त पदे भरणे , कर्मचा-यांच्या अनुपस्थिती बाबत, अंगणवाडीत ग्राम बाल विकास केंद्र कार्यान्वयाबाबत , प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावर बाल विकास केंद्र सुरू करणे, आरोग्याच्या सुविधा जनतेपर्यंत पोहचण्यासाठी प्रयत्न करणे, बाल विवाह प्रतिबंध कायद्याची अंमलबजावणी , जिल्हयातील रोजगार हमी योजनेअंतर्गत उपलब्ध करून दिलेल्या रोजगाराबाबत , रेशनिंग दुकानावर अन्न धान्याची उपलब्धता, विविध योजनांचा लाभ जनतेपर्यंत पोहचतो किंवा नाही याबाबत मुल्यमापन व पर्यवेक्षण इ. बाबींवर नियमित देखरेख ठेवेल व त्वरित अंमलबजावणी संदर्भात उपाययोजना करेल. केलेल्या कार्यवाहीचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

.

सही /-

(ज.कि.मगरे )

सह सचिव

प्रति,

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहायक

मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहायक

मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.सचिव,महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन नवी मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
विभागीय आयुक्त, नागपूर विभाग , नागपूर
अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नागपूर
जिल्हाधिकारी / सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी, नागपूर
सह सचिव, मंहिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक
जिल्हा आरोग्य अधिकारी, गडचिरोली
सभापती, महिला व बाल कल्याण समिती, जिल्हा परिषद., गडचिरोली
सभापती, आरोग्य समिती जिल्हा परिषद , गडचिरोली
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली
उप संचालक, आरोग्य सेवा , नागपूर मंडळ, नागपूर
उप आयुक्त (प्रशासन) , एबाविसेयो, नवी मुंबई
उप आयुक्त (विकास ) , विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, नागपूर
उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण) / ( ग्राम पंचायत), जिल्हा परिषद, गडचिरोली
सर्व बाल विकास अधिकारी, (नागरी /ग्रामीण / आदिवासी क्षेत्र) , गडचिरोली (Dy. CEO यांचे मार्फत)
.निवड नस्ती कार्यासन-५